**प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेसाठी अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गत निधी वितरणाबाबत (सन २०२३-२४).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२३/प्र.क्र.१८५/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०७ मार्च, २०२४

वाचा:-

१) केंद्र शासनाचे आदेश क्र.प्र.क्र.३-४/२०२२-Desk (PMP) दि.१४ मार्च, २०२३
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्र.शापोआ-२०२२/ प्र.क्र.१२६/ एस.डी.३, दि.३० मार्च , २०२३.
३) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२ एप्रिल, २०२३.
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/ प्र.क्र.८५/ एस.डी.३, दि.१८ मे, २०२३.
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.४०/अर्थ -३, दि.०८ डिसेंबर, २०२३
६) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२३-Desk (PMP) दि.१२ डिसेंबर, २०२३.
७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/ प्र.क्र.१८५/ एस.डी.३, दि.११ जानेवारी, २०२४.
८) केंद्र शासनाचे आदेश क्र.प्र.क्र.३-४/२०२३-Desk(PMP), दि.१३/०२/२०२४.
९) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०४/कार्यासन-६, दि.०७ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील मंजूर निधीमधील पहिल्या हप्त्याचा उर्वरित रु.१९०६९.४० लक्ष इतका निधी संदर्भाधिन दि.१३ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या आदेशान्वये राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीची विगतवारी सर्वसाधारण, अनुसूचित जाती व जमाती उपयोजना या घटकांतर्गत केली आहे. त्यानुषंगाने सदर निधीपैकी अनुसूचित जमाती उपयोजनाया घटकांतर्गत केंद्र हिस्स्याचा रु.२२८२.६१/- लक्ष इतका निधी उपलब्ध झाला आहे. तसेच, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी प्राप्त झालेला पहिल्या हप्त्यातील अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गतचा निधी दि.११ जानेवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. प्रस्तुत योजनेकरीता केंद्र व राज्य

हिस्स्याचे प्रमाण ६० :: ४० असे आहे. तथापि, स्वयंपाकी तथा मतदनीस यांच्या रु.२५००/- प्रती माह मानधनामध्ये रु.६००/- केंद्र हिस्सा व रु.१९००/- राज्य हिस्सा आहे. त्यामुळे राज्य हिस्सा मधून समरुप निधीपेक्षा जादा निधी वितरीत करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गत केंद्र हिस्स्याचा रु.२२८२.६१ लक्ष व राज्य हिस्साचा रु.२२३९.९० लक्ष असा एकूण रु.४५२२.५१ लक्ष निधी वितरणास मान्यता देण्याचा प्रस्ताव आदिवासी विकास विभागास सादर करण्यात आला होता. त्यानुसार आदिवासी विकास विभागाने संदर्भाधिन दि.०७ मार्च, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेला निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गत केंद्र व राज्य हिस्सा मिळून खालीलप्रमाणे लेखाशिर्षनिहाय रु.४५२२.५१ लक्ष (रुपये पंचेचाळीस कोटी बावीस लक्ष एक्कावन्न हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीय तरतूद (BE) | वितरणास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (पीएम-पोषण) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ I ५३२) | रु.१३०००.०० लक्ष | रु.२२८२.६१ लक्ष |
| २. | प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (पीएम-पोषण) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ I ५४१) | रु.६०००.०० लक्ष | रु.२२३९.९० लक्ष |
| | **एकूण** | **रु.१९०००.०० लक्ष** | **रु.४५२२.५१ लक्ष** |

२. सदरचा शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०४/कार्यासन-६, दि.०७ मार्च, २०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णयान्वये आदिवासी विकास विभागाने दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. प्रस्तुत निधीच्या उपयोजनाकरीता आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तसेच, राज्य समन्वय अधिकारी, प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजना, स्वतंत्र कक्ष, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा निधी ज्या प्रयोजनासाठी उपलब्ध करुन दिला आहे त्याच प्रयोजनाकरीता वापरण्यात यावा.

५. सदर निधी केंद्र व राज्य शासनाने वेळोवळी दिलेले निर्देश/आदेश/शासन निर्णय/परिपत्रक/सूचना यांना अनुसरुन विहित कालावधीत खर्च करण्याची दक्षता शिक्षण संचालक (प्राथ.) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेण्यात यावी. तसेच, सदर निधी खर्च केल्यानंतर याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१२३८४५३८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2024.03.07 12:47:57 +05'30'

**( प्रमोद पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

११) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) आदिवासी विकास विभाग (कार्या.६), मंत्रालय, मुंबई
१९) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती - एस.डी. ३